**ई-निविदा प्रणाली अंतर्गत अल्प कालावधीची निविदा सूचना प्रसिध्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र. निविदा-२०१९/प्र.क्र.११ (१)/ बांधकाम-४**
बांधकाम भवन २५ ,मर्झबान पथ,
फोर्ट मुंबई ४०० ००१
दिनांक: १८ जानेवारी, २०१९

वाचा:- १) शासन निर्णय ग्रा.वि. व ज.सं.विभाग क्र. संकीर्ण २०१०/प्र.क्र.१७२/पंरा-७
दिनांक १९ ऑक्टोबर,२०११
२) शासन निर्णय ग्रा.वि. व ज.सं.विभाग क्र. निविदा २०१२/प्र.क्र.९७/पंरा-७
दिनांक २३ सप्टेंबर, २०१३
३) शासन निर्णय ग्रा.वि.वि. क्र. निविदा २०१६/प्र.क्र.१९५/पंरा-७
दिनांक २६ जुलै, २०१६

**प्रस्तावना :-**

पंचायती राज संस्थांमध्ये विविध विकासात्मक कामे व विकास कामांसाठी लागणाऱ्या सेवा तथा वस्तुंची खरेदी यासाठी दिनांक १ जानेवारी,२०१२ पासून ई-निविदा कार्यप्रणालीचा अवलंब करणे संदर्भीय दिनांक १९.१०.२०११ च्या शासन निर्णयान्वये बंधनकारक करण्यात आले आहे. ई-निविदा प्रणाली अंतर्गत सुधारीत कार्यपध्दती व निविदा सूचनेचा कालावधी संदर्भीय दिनांक २३ सप्टेंबर, २०१३ व दिनांक २६ जुलै, २०१६ च्या शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आला आहे .

२. दरम्यान माहे नोव्हेंबर, २०१८ च्या अधिवेशनात पुरक मागणीद्वारे मंजूर झालेली कामे, रस्त्यांची कामे व पुलांच्या दुरुस्तीची कामे (महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था अंतर्गत प्रधानमंत्री व मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेची कामे वगळून), १३ व्या वित्त आयोगा अंतर्गत मंजूर झालेली कामे तसेच अन्य लोकहिताची विविध विकास कामे तातडीने व वेळेवर पूर्ण होणे आवश्यक असल्याने त्या अनुषंगाने, सदरील कामांची जाहीर निविदा सूचना काढणे, निविदा प्रक्रिया पुर्ण करणे व प्रत्यक्ष कार्यारंभ आदेश देऊन काम सुरु करणे ही सर्व प्रक्रिया त्वरेने पूर्ण करण्याच्या दृष्टीने अल्प कालावधीची निविदा सूचना प्रसिध्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. पंचायती राज संस्थां अंतर्गत रस्त्यांची कामे व पुलाच्या दुरुस्तीची कामे, १३ व्या वित्त आयोगाअंतर्गत मंजूर झालेली कामे तसेच अन्य लोकहिताची विविध विकास कामे त्वरेने मार्गी लागण्याच्या दृष्टीने, संदर्भीय दिनांक २३सप्टेंबर, २०१३ च्या शासन निर्णयातील परिच्छेद-४ (२) व संदर्भीय दिनांक २६ जुलै, २०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १ मध्ये सदर निविदा बोलविण्यासाठी निर्धारीत केलेला कालावधी आता पुढील प्रमाणे ठेवण्यास एक विशेष बाब म्हणून शासन मंजुरी देत आहे.

| अ. क्र. | कामाच्या निविदेची किंमत | निविदा सूचना क्रमांक व कालावधी | | |
|---|---|---|---|---|
| | | प्रथम | द्वितीय | तृतीय |
| १ | रुपये ५.०० लाखापेक्षा कमी किंमतीची कामे | ७ दिवस | ४ दिवस | ३ दिवस |
| २ | रुपये ५.०० लाख ते रु.५०.०० लाखापर्यंतची कामे | ७ दिवस | ५ दिवस | ३ दिवस |
| ३ | रुपये ५०.०० लाखापेक्षा अधिक किंमतीची कामे | ७ दिवस | ५ दिवस | ३ दिवस |

**२. वरील आदेश सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी त्यांच्या अधिनस्त सर्व खाते प्रमुखांच्या निदर्शनास आणून उपरोल्लीखीत कामे मुदतीत पुर्ण होतील याची दक्षता घ्यावी. दिनांक १ एप्रिल, २०१९ पासून वरील सवलत आपोआप रद्द होवून, संदर्भीय शासन निर्णय दिनांक २३ सप्टेंबर,२०१३ व दिनांक २६ जुलै, २०१६ मधील या संदर्भांतील तरतुदी पुनःश्च लागू होतील.**

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०११७१७४६२३७७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2019.01.18 17:24:02 +05'30'

(दि.बा.पाटील)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत-

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,

३) मा.मंत्री (ग्रामविकास विभाग) यांचे खाजगी सचिव,

४) मा.राज्यमंत्री (ग्रामविकास विभाग) यांचे खाजगी सचिव,

५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे स्वीय सहायक,

६) प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग यांचे स्वीय सहायक,

७) सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्रामविकास विभाग यांचे स्वीय सहायक,

८) विभागीय आयुक्त यांचे स्वीय सहायक (सर्व)

९) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.

१०) सर्व अतिरीक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.

११) सर्व प्रकल्प संचालक,जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,

१२) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,

१३) सर्व कार्यकारी अभियंता (बांधकाम, लघुपाटबंधारे, पाणी पुरवठा विभाग)जिल्हा परिषद

१४) सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती

१५) ग्रामविकास विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने

१६) निवडनस्ती, कार्यासन बांधकाम-४